# चित्तशुद्धी

- जयदीप चिपलकट्टी

(शहर: युजीन, ऑरेगन. स्थळ: अमेरिकेतल्या मध्यमवर्गीय उपनगरांत सर्वसाधारणपणे आढळतात तशा चेहऱ्यामोहऱ्याचं घर. लिव्हिंग रूम, किचन, बेडरूम, बाथरूम, बूट-चपला ठेवायची जागा अशा सगळीकडे बराच पसारा बाहेर पडलेला आहे. कपाटांच्या आणि ड्रॉवर्सच्या आतही अडगळ आहेच. काळ्या रंगाची एक मोठाली पसरट रबर बिन लिव्हिंग रूमच्या कॉफी टेबलवर ठेवलेली आहे. एकूणपन्नास वर्षांची एक मराठी बाई जमिनीवर अस्ताव्यस्त पसरलेल्या कपड्यांच्या मधोमध उताणी पडली आहे.)

(स्वत:ला उद्देशून) बयो, ऊठ! असं नुसतं लोळत पडून कसं बरं चालेल? ऊठ! (ती उठत नाही.) You can do it, girl! Just bloody get up! (अजूनही ती उठत नाही.) मिटलेल्या पापण्यांच्या अंत:पटलांवर एवढा वेळ अमेरिकन ड्रीम बघून झालं की नाही? मग आता डोळे उघड आणि त्या कल्पड्रिमाच्या कशा ठिकऱ्या ठिकऱ्या झाल्या आहेत ते पाहा!

(अर्थात स्वत:लाच उद्देशून) बरं बाई शूर्पणखे, उठते! उगीच शंख करू नकोस — (बाई सावकाश उठून उभी राहते. सिआटल सी-हॉक्सची एक ढगळ निळी जर्सी, टारगेटमध्ये घेतलेला राखाडी रंगाचा बेढब पायजमा आणि पायात रनिंग शूज असा तिचा पेहराव आहे. ती सेलफोनवर प्रयत्नपूर्वक गाणं निवडते आणि सोलो वॉल्ट्झ करत असल्याच्या आविर्भावात एकदोन मिनिटं घरभर निरुद्देश बागडत राहते. अधल्यामधल्या वस्तू उचलते आणि निरखून बघून परत ठेवते. मग गाणं बंद करून लिव्हिंग रूमच्या मध्ये उभी राहते आणि कशाचा काही संबंध नसलेल्या कवितांच्या ओळी हताश नाटकीपणे म्हणू लागते.)

The center cannot hold, and things fall apart;

Mere anarchy is loosed upon the world!

अम्रिकेऽतले घर कौलारू, घर कौलारू!

त्या कौलारी आज मीच वेडी, खिन्न नीरस एकांत गीत गाते!

च्च! अजून काही इन्स्पिरेशन मिळत नाहीय—

(जमिनीवर फतकल मारून बसून राहते. एवढ्यात तिचा सेलफोन वाजतो तसा तो कानाला लावते.) हॅलो! पोहोचलात का? ओके. (थोडं थांबून) आता अनपॅकिंग नीट करा. पहिलं काम म्हणजे तिचा लकी ड्रेस न चुरगळता हँगरला लावून ठेव. आणि हे बघ — तिला आयत्या वेळी अँक्झायटी होते. If that happens, ask her to breathe deeply for exactly two minutes. (थांबून) हो, ते मला माहीत आहे. 'मी सगळं बघतो' वगैरे ठीक, पण हा तिचा शेवटचा चान्स आहे. तेव्हा सीरियसली घे! ती घेईलच, तू पण घे. इतका पोकोकुरान्तेपणा करू नकोस. मी म्हणाले की इतका पो-को-कु-रा-न्ते-पणा करू नकोस! म्हणजे काय?! म्हणजे काय ते आपल्या कन्यकेलाच विचार. She should know by now. ओके. नीट करा सगळं. See you guys on Sunday. मी डिनर तयार ठेवते. बाय! लव्ह यू, माझ्या हबिड्या. (फोन बंद करून बाजूला ठेवते आणि उठून उभी राहते.)

कुठूनतरी सुरुवात ही करायलाच हवी. आमच्या ह्या टुमदार सबर्बन घराचं डीक्लुटरीकरण करण्याची गोड कामगिरी मी स्वत:वर ओढवून घेतलेली आहे. आमच्या म्हणजे आम्हा तिघांच्या. मी, माझा नवरा आणि आमची मुलगी अशा तिघांच्या. ओळख करून देते. माझं नाव रमा. रमा जोशी. नवऱ्याचं नाव अभिषेक जोशी. तो इथे युजीनमध्ये 'डेटा सोल्यूशन्स' किंवा 'ग्लोबल होरायझन्स' अशाच काहीतरी नावाच्या टेक कंपनीत आहे. आपण नक्की काय काम करतो हे मला समजावून सांगायचा त्याने दोनतीनदा प्रयत्न केलेला आहे, पण अजूनपर्यंत तो मी यशस्वी होऊ दिलेला नाही. आमची मुलगी मिताली पंधरा वर्षांची आहे. इथून दोन तासांच्या ड्राईव्हवर लेक ऑसवीगो नावाचं गाव आहे. तिथे उद्या, म्हणजे शनिवारी, तिची रीजनल स्पेलिंग बी आहे. त्यात ती जिंकली तर मेरीलंडमध्ये स्क्रिप्स नॅशनल स्पेलिंग बी असते तिथे जायला सिलेक्ट होईल. ह्या वर्षी तिचा शेवटचा

चान्स आहे कारण पुढच्या वर्षी एज-कटॉफ मध्ये बसणार नाही. तुम्ही केनियन असाल तर मॅरॅथॉन पळण्याची तुमच्यावर सांस्कृतिक सक्ती असते, त्याचप्रमाणे तुम्ही इंडो-अमेरिकन असाल तर तुमच्या अपत्याला स्पेलिंग बी मध्ये घालायची सक्ती असते. अपत्याला जाड ढापण असेल आणि दाताला ब्रेसेस असतील तर स्पेलिंग बी च्या स्टेजवर ते जास्त खुलून दिसतं. आणि प्रतिस्पर्ध्यांवर दडपणही येतं. ह्या दोन्ही अंगांनी मितालीची तयारी आहे. तिचा अभ्यास मीच घेते; 'पोकोकुरान्ते' वगैरे कैच्याकै शब्द मला माहीत आहेत याचं कारण तेच. पोकोकुरान्ते. अ‍ॅड्जेक्टिव्ह. लँग्वेज ऑफ ओरिजिन स्पॅनिश. डेफिनिशन: पोकोकुरान्ते मीन्स इनडिफरन्ट ऑर अ‍ॅपथेटिक. पी-ओ-सी-ओ-सी-यू-आर-ए-एन-टी-इ. पोकोकुरान्ते. नवऱ्यावर प्रेशर यावं म्हणून मी त्याला अ‍ॅपथेटिक म्हणाले, पण तसा तो काही अगदीच टाकाऊ नाही. रूरकीतून इलेक्ट्रिकलचा बी.टेक. आहे. तो बाहेर पडला आणि त्यानंतर दोन वर्षांनी रूरकीची आयआयटी झाली. त्यामुळे आपण आयआयटियन आहोत असं म्हणवून घ्यायचा त्याचा चान्स हुकला. अर्थात मुंबई-दिल्ली-कानपूर-खरगपूर-मद्रासवाले आद्य आयआयटियन्स रूरकीला खरी आयआयटी समजत नाहीतच.

पण तसं पाहिलं तर तो खरा जोशी पण नाही. म्हणजे आहे, पण त्याचा पूर्वेतिहास कळला तर आद्य जोशी त्याला जोशी समजायचे नाहीत. बारावी झाल्यावर त्याच्या बाबांनी कुठूनतरी खटपटलटपट करून आपण कुडमुडे जोशी आहोत असं जातीचं सर्टिफिकेट आणलं. त्यामुळे मग भटक्या आणि विमुक्त जमातीतला म्हणून त्याला रिझर्वेशनमध्ये इलेक्ट्रिकलला अ‍ॅडमिशन मिळाली. नाहीतर मायनिंग वगैरे कसलीतरी मागासलेली ब्रँच घ्यावी लागली असती. आता ते सर्टिफिकेट कितपत खरं आहे याबद्दल मला शंका आहे, पण एकदा झालं ते झालं. नंतर तो विस्कॉन्सिनला मास्टर्स करायला आला, पुढे नोकरी मिळाली, माझ्याशी लग्न झालं, ग्रीनकार्ड मिळालं, सिटिझनशिप झाली. ते मागचं आता कुणी उकरत बसत नाही.

बघा! अवांतर विषयांवर कितीही तोंडची वाफ दवडली तरी त्याच्या दढ्यानं डीक्लटरिंग आपोआप होत नाही. ते मलाच अ‍ॅक्टिव्हली करावं लागणार आहे. घरधनी आणि लेक रविवारी संध्याकाळी परत येतील. याचा अर्थ (सेलफोनमधल्या घड्याळाकडे बघत) ह्या अडगळीचा बीमोड करायला माझ्याकडे पुढचे अठ्ठेचाळीस तास आहेत. मात्र ह्या क्षणी फ्रायडे इव्हिनिंग चोरपावलांनी जवळ येत

चाललेली आहे. अशा कातरवेळी घरात कोंडून घेऊन कोण बसेल बरं?! म्हणून मग आज संध्याकाळी साडेसात वाजता अमृता साने आणि प्रीती देशपांडे अशा दोन मैत्रिणींबरोबर डिनरचा प्लॅन आहे. अलार्म सेट करून ठेवते म्हणजे विसरायची नाही.

ही सगळी अडगळ मुळात बाहेर कशी निघाली ते सांगते. व्हॉट्सॅपवर कुणीतरी मला 'स्वीडिश डेथ क्लीनिंग'वरची एक व्हिडिओ लिंक फॉरवर्ड केली. त्याचा बेसिक फंडा असा की समजा तुम्ही अचानक मेलात तर आयुष्यभर तुम्ही जमवलेली सगळी अडगळ दुसऱ्या कुणालातरी साफ करावी लागणार. बहुतेक तुमच्या मुलांना करावी लागणार. तुमच्या मयताला जाऊन आल्यानंतर जेव्हा केव्हा ही वेळ येईल तेव्हा त्यांची जबरदस्त चिडचिड होणार. तुमच्या नावाने ते खडे फोडणार. हे होऊ नये असं जर तुम्हाला वाटत असेल तर जिवंतपणीच त्यांची कीव करा आणि तुमची अडगळ आजच्या आज तुम्हीच साफ करा.

(खांदे उडवत) All right! I agree that there is a point here. पण एकतर ह्या कल्पनेत नेमकं स्वीडिश काय आहे ते कळलं नाही. अचानकच मरायचा झाला तर स्वीडनपेक्षा मेक्सिकोतला नाहीतर सोमालियातला माणूस मरायचे चान्सेस जास्त आहेत. But I guess Swedish is seductive. अमेरिकन लोकांचं हे नेहमीचं आहे. जगण्याचे आपले बेसिक फंडेज गंडलेले आहेत असं त्यांना सतत वाटत असतं. म्हणजे एकतर तिबेटमधले खूप गरीब लोक किंवा स्कॅन्डेनेव्हियातले खाऊनपिऊन सुखी लोक हे 'जीवन त्यांना कळले हो' कॅटेगरीत येतात आणि आपल्या चंगळवादी अमेरिकन समाजाला त्यांच्यापासून खूप्खूप शिकण्यासारखं आहे असं कुणी ना कुणीतरी त्यांना सतत पढवत असतं. हा पण त्यातलाच प्रकार वाटतो. आणि ते काही असलं तरी मी म्हणते की आम्ही दोघे मेल्यावर आमची अडगळ आमच्या पोरीला काढावी लागली तर त्यात काय बिघडलं? ही जगरहाटीच नाही का?! भारतात राहणारे आमचे आईबाप जेव्हा मरतील तेव्हा त्यांची अडगळ आम्हालाच काढायची आहे. आपण जन्माला आल्यावर नाळ आपली आपल्याला तोडता येत नाही, किंवा मेल्यावर चिता आपली आपल्याला पेटवता येत नाही. ह्या गोष्टी आपल्यासाठी दुसऱ्यांनी करायच्या असतात, आणि दुसऱ्यासाठी आपण करायच्या असतात. तसंच आहे हे! थोडक्यात काय तर स्वीडिश डेथ क्लीनिंगमागचा फाउंडेशनल फंडा मला तेवढा काही पटला नाही.

पण अर्थात एवढ्यावर हे संपलं नाही. यू-ट्यूबवरचे व्हिडिओ चक्रव्यूहासारखे अरेंज केलेले असतात. एक बघितला की दुसरा येतो. दुसरा बघितला की तिसरा येतो. कुठला कधी येणार यामागे काहीतरी अल्गॉरिथम असतो असं मी ऐकलेलं आहे. तो कदाचित माझ्या नवऱ्यानेच लिहिलेला असू शकेल. मला अमुक व्हिडिओ न दाखवता तमुक दाखवण्यामागे कुठल्यातरी शेडी बिग कॉर्पोरेशनचा काहीतरी फायदा असणार. असला तर असू दे. It doesn't matter. If you can't beat them, join them. डीक्लटरिंगवरचे व्हिडिओ बघणं हा डीक्लटरिंग करण्याला चांगला सब्स्टिट्यूट आहे. म्हणून मी थोडे दिवस चक्रव्यूहातच रमले. डीक्लटर करताना बेअक्कल लोकांच्या होणाऱ्या एकतीस चुका, तुम्हाला घरात क्लटर नको असेल तर अमक्यातमक्या सत्तेचाळीस वस्तू कधीही खरेदी करू नका, असले सगळे व्हिडिओ माझे कंपल्सिव्हली बघून झाले. व्हिडिओ बनवणाऱ्या ह्या सगळ्या गोऱ्या बायका असतात, प्रत्येकीचा आपापला यू-ट्यूब चॅनल असतो. माझ्याचसारख्या अमेरिकन सबर्बन घरांत राहतात, पण त्यांचं घर हे असं अनार्किकल दिसत नाही. टोटल टीपटाप असतं. मिनिमॅलिझमची मांदियाळी झालेली असते. डीक्लटरिंग यशस्वी झाल्याचं सिंबॉलिक ध्वजारोपण म्हणून व्हिडिओत मागे बॅकग्राउंडला आयकियाच्या कुंडीत एक नीटनेटका कॅक्टस लावलेला असतो. आत्ताच पेडिक्युअर केलेल्या स्वच्छ अनवाणी पायांनी घरभर हिंडत सख्यांनो लाईक करा, सब्स्क्राईब करा असं त्या सतत म्हणत राहतात. ते आपण केलं की पुढचे व्हिडिओ न थांबता येत राहतात.

काही वेळा मग ते डीप आणि मेटॅफरिकल व्हायला लागतं. हे नुसतं घराचं डीक्लटरिंग नसून मनाचं डीक्लटरिंग आहे असा एक संदेश त्यातून मिळायला लागतो. काही लोकांना हा मनाचा फेटिश असतो. प्रत्येक गोष्टीचा संबंध मनाशी जोडायला बघतात. उदाहरणार्थ, समजा बागेत काम करत असतील तर आपण मनातलं तण काढतो आहोत किंवा मनाची मशागत करतो आहोत असा ते एक आव आणतात. उलट काही लोक सॉलिड असतात. ते असं करत नाहीत. आता मी अधूनमधून जिच्याकडे पेडिक्यूअरला जाते ती डिंग फॉट उंग की अशाच काहीतरी नावाची व्हिएतनामीज बाई आहे. पेडिक्यूअर झालं की पैसे घेते, टिप घेते आणि 'थँक यू, काम आगेन!' असं म्हणून आपल्याला वाटेला लावते. 'मॅडम, पायाला घाण लागू नये म्हणून जपता तशा मनाला घाण लागू नये म्हणून जपा हो!' असला काहीतरी उपदेश करत बसत नाही.

But anyway! असे एकाचं शेपूट धरून एक करत माझे बरेच व्हिडिओ बघून झाले. And once you are in this labyrinth, it is only a matter of time before you are confronted with Marie Kondo. मरी कोंडो कोण हे तुम्हाला माहीत नसेल तर you must be living under a rock. पण जिला नाहीच माहिती अशी कुणी गरीब अश्राप बाई अंधाऱ्या गुहेत दगडाखाली अडकली असेल तर तिच्यासाठी म्हणून सांगते. त्याआधी पहिली गोष्ट म्हणजे मरी कोंडोच्या नावाचं खरं प्रोनन्सिएशन काय ह्या वादात मी पडत नाही. कुणी मरी म्हणतात, कुणी मरिए म्हणतात, कुणी कोंडो म्हणतात, कुणी कोंदो म्हणतात, कुणी सत्यदेव म्हणतात, कुणी सत्यनारायण म्हणतात, ते सगळं एकच. मरी कोंडो ही डीक्लटरिंग ह्या प्रांतातली झाशीची राणी आहे. तिचं म्हणणं असं की समजा तुम्हाला कपडे डीक्लटर करायचे आहेत. तर तुमच्याकडे जितके कपडे आहेत त्यांचा एकच मोठा ढीग करायचा. त्यातला एकेक कपडा चिमटीत उचलायचा आणि स्वत:ला असा प्रश्न विचारायचा की: does it spark joy? म्हणजे उदाहरणार्थ, (कपड्यांच्या ढिगाऱ्याकडे जाते) व्हिक्टोरियाज् सीक्रेटमध्ये इंपल्स म्हणून घेतलेली ही लाल चड्डी बघून माझ्या हृदयात सुखद कळ येते का? (अभिनय करून दाखवते.) येत असेल तर ती चड्डी सांभाळून ठेवायची. ठेवताना ती एका विशिष्ट पद्धतीने फोल्ड करावी लागते पण तो नंतरचा भाग झाला. पण समजा मुळात अशी कळ येतच नसेल तर you thank the piece for everything it has done to enhance your life. And then you let it go.

(चड्डी हातात धरून खेळवत पुन्हा एकदा वॉल्ट्झ स्टेप्स करत इकडेतिकडे बागडते. मध्येच हृदयावर हात ठेवून पाहते.) Unfortunately, no spark at all. हृदयात पूर्ण गारवा आहे. (गंभीरपणे) माझा निर्णय झालेला आहे. (गुडघे टेकून बसते.) हे रक्तचड्डिके, तुला परिधान केल्यामुळे माझ्या लाडक्या अभिषेकबरोबर ज्या बेधुंद रात्री मला लाभल्या त्यांबद्दल मी तुझे मन:पूर्वक आभार मानते. पण आपलं नातं आता संपलं आहे आणि माझ्या हृदयात सुखद कळ उत्पन्न करण्याच्या कामी तू कुचकामी ठरली आहेस. म्हणूनच मी आता तुला डोनेट करणार आहे. चॅरिटी शॉपच्या हँगरवर तू पुन्हा एकदा लटकशील आणि कालांतराने दुसऱ्या कुणा भाग्यवान स्त्रीच्या पार्श्वभागावर विराजमान होशील. त्या स्त्रीच्या आयुष्यात माझ्याहीपेक्षा जास्त संख्येने बेधुंद रात्री येवोत अशी सदिच्छा ह्या

ठिकाणी व्यक्त करून मी तुझी रजा घेते. (चड्डी अलगद चिमटीत धरून काळ्या बिनमध्ये टाकते आणि बिनला नमस्कार करते.)

फेकून देते हे ढुंगणावरचं लक्तर, होम डेपोतून घेतलेल्या काळाशार डोहामध्ये
पण एवढ्यातेवढ्याने नाहीच होणार अंत, माझाही आणि माझ्या क्रुटरचाही!

As you can see, this is kind of fun. But only in moderation. हे असं फार वेळ चालवत राहणं अवघड आहे. (ढिगातले चारसहा कपडे इकडेतिकडे उडवून खोबण तयार करते आणि त्यात रेलून बसते.) असा प्रत्येक आयटम उचलून बघून हृदयावर हात ठेवून तपासत बसलं तर भयंकर दमायला होईल. इतका अथक आणि कन्सिस्टंट रणरागिणीपणा करत राहणं कदाचित मरी कोंडोला जमत असेल, पण मला ते बापजन्मी शक्य नाही. माझा बाप सैन्यात होता हे कबूल, पण मी नाही. I am an easy going girl. त्याच्याइतकं फायटिंग स्पिरिट माझ्यामध्ये नाही. (काही सेकंदांनंतर सुस्कारा टाकून अनिच्छेने उभी राहते.)

(खोल श्वास घेत) I might as well tell you about him. माझे बाबा म्हणजे सुभेदार-मेजर विश्वासराव सोनवणे. (थांबून) I guess the cat is out of the bag. आडनावावरून कळतंच. माझे बाबा महार रेजिमेन्टमध्ये होते. तुम्ही महार नसाल किंवा महारांकडे विशेष लक्ष द्यायचं तुम्हाला कारण पडलं नसेल तर ह्या विषयात केवढं बॅगेज आहे याची तुम्हाला नीट कल्पना येणार नाही. म्हणून पहिल्यापासून सांगते. We need a short history lesson here.

१८१७ साल संपत आलं तेव्हाची गोष्ट. त्याआधी बऱ्याच वर्षांपासून दुसरा बाजीराव इंग्रजांवर खार खाऊन होता. शेवटी एकदाचं दोघांत युद्ध पेटलं. पहिली एक लढाई खडकीला झाली. नंतर कोरेगावला जी झाली, त्यात पेशवा फौज बरीच जास्त होती आणि इंग्रजांची त्यामानाने कमी होती. पण तरीही या लढाईत इंग्रजांनी पेशवा फौजेला हरवलं म्हणा किंवा निदान थोपवून धरलं म्हणा. यावेळी इंग्रजांच्या फौजेतले जे सैनिक मेले त्यांतले काहीजण महार होते. लढाईचं मॉन्युमेंट म्हणून इंग्रजांनी नंतर कोरेगावला एक दगडी स्तंभ वगैरे उभारला आणि त्यावर ह्या सैनिकांची नावं

लिहिली. पुढे काही महिन्यांनी पेशवा शरण आला आणि पेशवाई बुडाली वगैरे झालंच.

पण कोरेगाव प्रकरणाची गोष्ट एवढ्यावर संपली नाही. त्यातून वेगवेगळी नॅरेटिव्ह्ज तयार झाली. पहिलं म्हणजे 'इंग्रजांनी महारांना वापरून घेऊन बामणांची ठासली' हे नॅरेटिव्ह. इथे आता दुसरा बाजीराव हा कितीही नालायक असला तरी आपला माणूस. इंग्रज परके. महारांनी त्यांच्याशी हातमिळवणी केली याचा अर्थ ते देशद्रोही, असं एक सबनॅरेटिव्ह त्याला चिकटलं. उलट्या बाजूने याला काउंटरनॅरेटिव्ह आहे ते असं की पेशवाई ऐन भरभराटीत असताना सगळी सत्ता बामणांचीच होती. तेव्हा त्यांनी अत्यंत माज केला. रमणे उडवले. आमच्या गळ्यांत मडकी बांधून गावाची राखण करायला आम्हाला अर्धपोटी हिंडवलं आणि स्वत: मोदक खाऊन ढेऱ्या वाढवल्या. याउलट आम्हाला मानानं कुणी वागवलं असेल तर ते इंग्रजांनी वागवलं. त्यांनी आम्हाला युनिफॉर्म दिला, हातात बंदूक दिली. आमचे लोक लढाईत मेले तेव्हा त्यांची नावं इतिहासातून पुसून जाऊ नयेत याची काळजी केली. तेव्हापासून परेड ग्राउंडवरसुद्धा आणि दैनंदिन आयुष्यातसुद्धा आमचे कमांडिंग ऑफिसर ते.

आता हे काउंटरनॅरेटिव्ह माझ्या बाबांनी तसंच्या तसं अख्खं खाऊन पचवलं होतं असं काही नाही. इतिहासात इतकं सरळसोट कधीच काही नसतं. पण तरीही महाराला सैन्यात जायचं असेल तर त्याच्यामागे एक परंपरा आहे, तिथे त्याला एक हक्काची जागा आहे, आंबेडकरांचेपण वडील सैन्यात होते, अशा काही कल्पनांना ते धरून राहिले. आंबेडकरांच्या पहिल्या बायकोचं होतं म्हणून माझं नाव त्यांनी रमा ठेवलं हे पण त्यातूनच कुठूनतरी आलं. तर यातला उपमुद्दा असा की माझं माहेरचं आडनाव सोनवणे. पासपोर्टवर तेच आहे. पण इथे आता समजा युजीन मराठी मंडळात दिवाळीचं फंक्शन असेल तर कोरेगावची लढाई डोक्यात ठेवून तिथे जाण्यात पॉइंट नाही. साठे-लेले-गोखले वगैरे आडनावांच्या बायका तिथे पसरलेल्या असणारच. म्हणून मग मी नेहमी जोशी लावते. साठे-लेले-गोखले काही माझा पासपोर्ट बघायला यायच्या नाहीत.

तर माझ्या इतिहासात अशी सगळी अडगळ आहे. आणि घरातपण आहे. आता कुठूनतरी भंपक पॉप सोशिऑलॉजी आणून ह्या दोहोंचा थिअरेटिकल संबंध जोडता येईल. अनादि काळापासून बिचाऱ्या रमा सोनवणेचे पूर्वज भकासवाण्या झोपड्यांत राहिले. दोन मातीची भांडी आणि एक तरट

एवढ्यावर संसार करून मरून गेले. तर अशी ही वीरकन्या मनुवाद्यांच्या तावडीतून सुटून जेव्हा अमेरिकेला गेली तेव्हा शतकानुशतकं झालेल्या वंचनेचा सिंबॉलिक वचपा काढायचा म्हणून तिने आपल्या सबर्बन घरात सामानाची रेलचेल करून टाकली. क्लटर ही तिच्यासाठी एका सामाजिक बंडाची ग्वाही आहे.

किंवा अल्टरनेट हायपॉथिसिस असाही मांडता येईल की लहानपणी बाबांच्या सतत बदल्या व्हायच्या, त्यामुळे सामान हलवताना रमाबेबी सोनवणेच्या भावल्या आणि गुबगुबीत स्वेटर काढून टाकावे लागायचे. तर अशा रीतीने तिचं डिप्रायव्हेशन झाल्यामुळे मोठी झाल्यावर ती ऑबसेसिव्हली वस्तू जमवून ठेवते आहे. मग त्यांचा उपयोग असो किंवा नसो. For her, clutter is a kind of emotional blanket.

पण तसं काही नाही. Both theories are basically crap. इथे सगळेचजण अडगळ गोळा करतात. एकदा आयकियात गेलं की तिथून लगेच बाहेर पडता येऊ नये असा कॅपिटॅलिष्ट भुलभुलैया असतो. त्यामुळे मग वैविध्यपूर्ण मेणबत्त्या, नॅपकिन रिंग्स, काटेचमचे, काटेचमचे ठेवायचे होल्डर, तीन प्रकारचे पाण्याचे ग्लासेस, पाच प्रकारचे वाईन ग्लासेस वगैरे गोळा होतात. व्हेकेशनला गेलं की सुवेनीर शॉप्समध्ये मोह पडतो. त्यामुळे मग वैविध्यपूर्ण फ्रिज मॅग्नेट्स आणि कॉफी मग्स गोळा होतात. ख्रिसमस आला की लोक एकमेकांना यूसलेस गोष्टी गिफ्ट म्हणून देतात. शिवाय वीकेंडला यार्ड सेल टाकून इतर सबर्बन मातांबरोबर क्लटरचं आदानप्रदान करण्याची प्रथा आहेच. अशा सगळ्यामुळे प्रॉब्लेम वाढत जातो. भारतापेक्षा इथली घरं मोठी असतात, त्यामुळे अडगळ जमवण्याची कपॅसिटी पण वाढते. हा सगळा मानवी स्खलनशीलतेचा दोष आहे. मनुवाद्यांचा नाही आणि चाईल्डहूड ट्रॉमाचा पण नाही.

आता एका बाजूने मला मिनिमॅलिझमवाल्यांचं पटतं. वस्तू घेताना मनोमन थांबून दहा वेळा विचार करा, इंपल्सिव्हली खरेदी करू नका, हे सगळं पटतं. पण एकतर तेवढा मनोनिग्रह राहात नाही, आणि तसं करायचं म्हटलं तर खरेदीतली निम्मी मजा जाते. आणि ह्या सगळ्याला एक दुसरी सीरियस बाजू आहे. उदाहरण म्हणून सांगते. इथे जवळच न्यूपोर्टला एक बीच शॉप आहे. स्विमसूट्स,

बीच टॉवेल्स, फ्लिपफ्लॉप्स, सनग्लासेस असले आयटेम्स तिथे अव्वाच्या सव्वा किंमतीला ठेवलेले असतात. यातलं मी कधी काही घेतलं नाही, पण गेल्या समरमध्ये मितालीला तिथे पार्ट टाईम रीटेल जॉब मिळाला होता. तेवढे दोनतीन महिने काम करून तिला थोडा कॉन्फिडन्स आला. वेगवेगळ्या माणसांशी कसं वागायचं ते कळलं, आपलं स्वत:चं बँक अकाउंट उघडून त्यात पे-चेक डिपॉझिट करायचा, तिला हेडफोन्स हवे होते ते बजेट सांभाळून कंपॅरिझन-शॉपिंग करून कसे घ्यायचे या सगळ्याची प्रॅक्टिस झाली. That was a good learning experience for her.

पण असल्या शॉपचा बहुतेक सगळा बिझिनेस इंपल्स परचेसचाच असतो. सनग्लासेस हातात घेऊन त्यांच्याकडे अर्धा तास अनिमिष नेत्रांनी पाहात, मला ह्या वस्तूची खरोखरीच आंतरिक गरज आहे का असा विचार करत बसलं तर ते कुणीही विकत घेणार नाही. पण मग असं शॉप टिकणारच नाही आणि असले रीटेल जॉब्सपण राहणार नाहीत. लोकांचा वायफळ खर्च वाचेल आणि क्लटर कमी होईल ही गोष्ट चांगलीच आहे. पण मितालीसारख्या मुलामुलींना जी एक संधी अव्हेलेबल आहे ते मार्केटच अख्खं खलास होईल. असं ते सगळं त्रांगडं आहे.

तेव्हा खरेदी ही होतच राहणार आणि घरात वस्तू येतच राहणार. That much is inevitable. आता सनग्लासेससारखी वस्तू जो तो आपापली घेणार ते जाऊ द्या, पण निदान घरातल्या दर्शनी वस्तू सगळ्यांसाठी कॉमन असतात. त्या घेताना जास्त विचार करायला पाहिजे. खास करून त्या एकमेकांशी मॅच होतात का ते बघायला पाहिजे. पण माझा एक रिग्रेट म्हणजे सगळ्या घराचं मिळून एक कन्सिस्टंट अ‍ॅस्थेटिक डोक्यात ठेवायचं आणि वस्तू विकत घेताना ते फॉलो करत राहायचं असं झालं नाही. अभिषेकचा जॉब नवीन होता आणि मिताली नुकतीच झाली होती तेव्हा काटकसर ही करावीच लागायची. तेव्हा आम्ही बरंचसं शॉपिंग वॉलमार्टमध्ये करायचो. नंतर त्याला नाकं मुरडायला लागलो, पण सुरवातीच्या दिवसांत घेतलेलं वॉलमार्टी फर्निचर घरात जागा अडवून आहे ते अजूनही कुठे गेलेलं नाही. चीप दिसत असलं तरी ते टाकवत नाही. दोघांची नीट करियर असती तर इतकी ओढाताण झाली नसती. पैशाच्या बाबतीत प्रत्येक मुलीनं स्वावलंबी व्हायला पाहिजे असं एक आईने मनात बिंबवलं होतं. तिचा नवरा मिलिटरीतला, त्याच्या सतत बदल्या, त्यामुळे तिला ते शक्य नव्हतं. पण मलाही ते धड जमलं नाहीच. माझी सिंबायोसिसमधली अकाउंटन्सीची डिग्री

होती, पण नंतर अभिषेकबरोबर इकडे अमेरिकेत आल्यावर तिचं पुढे काही झालं नाही. अमेरिकेतल्या कितीतरी फर्स्ट जनरेशन मराठी बायका अशा टाईम वॉर्पमध्ये सापडतात. बहुतेक जणी नवऱ्याच्या नोकरीमुळे इकडे आलेल्या असतात. नवरा जसजशी कंपनी बदलेल तसा दरवेळेला सगळा बाडबिस्तारा हलवून टेक्सास सोडून मिशिगन, मिशिगन सोडून ऑरेगन असं करत राहावं लागतं. त्यामुळे पुण्यामुंबईत राहिल्या असत्या तर जशी त्यांची सुसंगत करियर झाली असती तशी इथे होत नाही. तरी पण आम्ही गेली सातेक वर्षं इथे सेटल झालो आहोत हे एक बरं आहे. मिताली थोडी मोठी झाल्यावर मग पुन्हा काहीतरी अकाउंटन्सी-रिलेटेड सुरू करायचं म्हणून मी एच अॅन्ड आर ब्लॉकमध्ये काम करायला लागले. आता तिथे काही फार मेंदूला खुराक मिळेल अशासारखं काम नसतं. क्लाएंट आला की समोर बसवायचा. एक स्टॅन्डर्ड सॉफ्टवेअर असतं, त्यात त्याच्या डब्ल्यू-टूतले आकडे जिथल्या तिथे भरले की टॅक्स रिटर्न तयार होतो. त्याचा प्रिंटाउट काढायचा, क्लाएंटची सही घ्यायची, पेमेंट घ्यायचं की पुढचा क्लाएंट. अशी असेंब्ली लाईन चालू राहते. कंपनी तशी बरी आहे, पण काम सीझनल असतं. एप्रिलची टॅक्स-डेडलाईन गेली की सगळं रोडावतं. पण यापेक्षा बरा ऑप्शन सध्या तरी दिसत नाहीय. सुरवातीला साठे-लेले-गोखल्यांचे टॅक्स रिटर्न्स मी करायचे, पण मग त्यांची इन्कम आपसूक कळत असल्यामुळे ते सगळं न बोलता ऑकवर्ड व्हायला लागलं. म्हणून मग ठरवलं की ओळखीपाळखीने इंडियन क्लाएंट मिळाले तर चांगलंच आहे, पण मराठी नकोत.

Anyway, I should really get back to business! क्लटर ह्या विषयाभोवती गस्त घालून डीक्लटरिंग होणार नाही. त्यासाठी मलाच हातपाय हलवावे लागणार आहेत. कोंडोराणीच्या प्रभावाखाली येऊन हे ढीग मी बाहेर काढले खरे, पण खुद्द तिची मेथड वापरण्याइतका पेशन्स माझ्यामध्ये नाही. त्यामुळे मग आता अधिक सुलभ पर्याय म्हणून, ऑनियन मेथड, अर्थात 'हाताने कांदा सोलणे' पद्धती, ट्राय करायची ठरवते आहे. ही अर्थात मी अशाच एका व्हिडिओतून शिकले. यामागची वर्किंग फिलॉसॉफी अशी की क्लटर हा तुमचं घर व्यापून राहिलेला एक कांदा समजायचा. कांदा सोलताना एकेक पापुद्रा निघत जातो तसं डीक्लटरिंग करायचं. The first step is easy. कांदा कुठल्याही रेसिपीत कसाही वापरला तरी वरचा पापुद्रा खायचा नसतो हे समान गृहीतक आहे. तीच मेटॅफर इथे लावायची आणि ज्या वस्तू सरळसरळ टाकाऊ आहेत त्या आधी टाकून द्यायच्या. मग खालच्या पापुद्र्याला हात घालायचा. मग त्याच्या खालच्या, त्याच्या खालच्या, असं करत जायचं.

सोपे निर्णय आधी घ्यायचे, अवघड निर्णय नंतर घ्यायचे. यू-ट्यूब चॅनलवाल्या बायकांच्या म्हणण्याप्रमाणे खालचे लेअर्स हे इमोशनल-स्पिरिच्युअल वगैरे असतात, कारण वास्तवात ते आपल्या मनाचे पापुद्रे असतात इत्यादि इत्यादि. You get the idea. असू देत; आत्ता मी फक्त वरचा पापुद्रा काढून टाकणार आहे. पुढचं पुढे.

(नाट्यमय आविर्भावात) And thus, I hereby commence the onion method! (इथून पुढे बोलणं चालू ठेवत, ये-जा करत राहात, अधूनमधून एखादा टी-शर्ट, टँक टॉप, उशीचा अभ्रा वगैरे बिनमध्ये फेकून देते.) इथल्या वॉलमार्टच्या पार्किंग लॉटमध्ये साल्व्हेशन आर्मी, डायबिटीस फाउंडेशन वगैरे जगत्कल्याणी मंडळींच्या बिन्स आहेत. हे सगळं मी त्यांना डोनेट करणार आहे अशी सध्या मनाची समजूत करून घेते आहे. प्रत्यक्षात होईल तेव्हा होईल. बाकी दिलेल्या कपड्यांचं ह्या चॅरिट्या काय करतात तेही एक गूढच आहे. मी एका व्हिडिओत बघितलं की नैरोबीत कुठेतरी गल्ल्याच्या गल्ल्या पसरलेलं यूज्ड क्लोदिंग मार्केट आहे. इथून शिप केलेले कपडे तिथले दुकानदार किलोच्या भावाने घेतात आणि रीटेलमध्ये विकतात. मला ही अरेंजमेंट अत्यंत आवडली. आपली अडगळ जाते आणि केनियन लोकांची सोय होते. पण मितालीला हे आवडत नाही. तिचं म्हणणं असं की you are just flooding their market with cheap stuff. असं करून तुम्ही तिथलं लोकल मॅन्युफॅक्चरिंग मारून टाकता. त्यामुळे मग तिथे राहणारे एमवांगी, एनगुंडू अशी आडनावं धारण करणारे शिंपी बेकार होतात. यावर आता मी म्हणते की लोकांना पाहिजेत तसे कपडे रास्त भावानं मिळणं महत्त्वाचं. मग ते लोकल शिंप्याने शिवले काय किंवा बांगलादेशी शिंप्याने ढाक्यात शिवलेले कपडे अमेरिकेमार्गे केनियात पोहोचले काय. एकूण एकच. पण नाही. मितालीचं म्हणणं की ते एकूण एकच नाही. आपण जे काही कंझ्यूम करतो त्याचा सगळ्या बाजूंनी विचार करायला पाहिजे. वस्तू तयार झाल्यापासून लँडफिलमध्ये जाईपर्यंत ती कसलेकसले सामाजिक परिणाम घडवत जाते, त्यातले इष्ट कुठले आणि अनिष्ट कुठले, हे सगळं ऑबसेसिव्हली ट्रॅक करत राहिलं पाहिजे. आता तिचं अगदीच काही खोटं नाही. पण असं करत राहिलं तर दमणूक फार होते. It is just not practical. परंतु अलिकडे ती पक्की वोक झालेली आहे. काही खरे आणि बरेचसे काल्पनिक अन्याय तिला सतत आजूबाजूला दिसत राहतात. त्यामुळे मग आमच्या ठिणग्या उडतात. अर्थात आधीच ती खूप हुशार

आणि त्यात टीनेजर असं कॉंबिनेशन झाल्यामुळे कुठेतरी एक्स्ट्रीमला जाणं साहजिक आहे, पण तिचा हा वोकपणा अधूनमधून इरिटेटिंग होतो हे नाकारण्यात अर्थ नाही. For example. (कपाट उघडून एक वारली डिझाईनची शॉपिंग बॅग बाहेर काढते.) खरं म्हणजे ह्या पिशवीत ऑब्जेक्शन घेण्यासारखं काहीही नाही. पण मितालीला ते दिसतं. तिचं म्हणणं असं की हे कल्चरल अप्रोप्रिएशन आहे. वारली आर्ट ही वारली लोकांची सांस्कृतिक मालमत्ता आहे, ती तुम्ही पांढरपेशा लोक ओरबाडून घेता. कुणीही उठतो आणि वारली डिझाईन काढतो. वारल्यांनी पिढ्यानपिढ्या ती कला जपली, पण त्यांना यातून काही मिळत नाही. ह्या बॅगचं डिझाईन खरंच वारली माणसाने काढलेलं असेल आणि त्या कामाचा रास्त मोबदला त्याला मिळालेला असेल तरच ही बॅग घ्यायचा तुम्हाला हक्क आहे. नाहीतर नाही.

वन्स अगेन, तिचं म्हणणं पूर्ण चुकीचं आहे असं मी म्हणणार नाही. पण हे किती पुश करणार ना?! खूप वर्षांपूर्वी केव्हातरी ही बॅग मी तुळशीबागेत विकत घेतली. आता हे डिझाईन कुणी काढलेलं आहे ते तिथे मी कुणाला विचारणार होते? तसं शक्यच नाही. आणि सांस्कृतिक मालमत्ता म्हणजे नक्की काय? समजा उदाहरणार्थ इंडियन रेस्टॉरंटमध्ये गेल्यावर तुम्ही असं म्हणणार का की मटण बिर्याणी ही मुघल साम्राज्याची सांस्कृतिक मालमत्ता आहे, तेव्हा लखनौत सहा पिढ्या गेलेल्या, रीतसर सुंता झालेल्या आणि दाढीला मेंदी लावणाऱ्या माणसाने बनवलेली असेल तरच ती बिर्याणी, नाहीतर नाही? That would be ridiculous. मी म्हणेन की मटण बिर्याणी ही कल्चरल कन्सेप्ट आहे. एकदा ती सगळीकडे ट्रान्समिट झाली की कुणालाही ती वापरायचा अधिकार आहे. त्या पॉइंटला एका ठराविक जातीजमातीची मक्तेदारी अशी ती राहात नाही. वारली डिझाईनचं तसंच आहे. पण यावर मिताली म्हणते की वारली लोक ऑप्रेस्ड आहेत तितके काही इथे इमिग्रेट झालेले मुसलमान ऑप्रेस्ड नाहीत. त्यामुळे वारली लोकांबद्दल आपल्याला जास्त कल्चरल सेन्सिटिव्हिटी पाहिजे. Well, I don't know about that. एकतर शुद्ध तुपातले वारली असे आता फार थोडे उरले असणार. मला वाटतं त्यांच्यापैकी कित्येक जण केव्हाच मुंबईत येऊन सेटल झालेले आहेत. धारावीतले मोबाईल फोनचे दुकानदार वारली वगैरे असू शकतील. त्यांतल्या बहुतेकांना वारली डिझाईन मुळीच काढता येत नसणार. याऐवजी मग जो माणूस जन्माने वारली नाही पण ड्रॉईंग व्यवस्थित शिकलेला

आहे, त्याने तो पॅटर्न वापरून डिझाईन काढलं तर ते जास्त चांगलं नाही का होणार?! That would be my argument. (दीर्घ निश्वास सोडते.)

पण मितालीशी वाद घालत बसणं खूपदा एक्झॉस्टिंग होतं. Maybe I should give in to her for once? ती एवढं म्हणतेय तर एकदा ऐकते. (वारली बॅग बिनमध्ये ठेवते.) मिताली परत आल्यावर तिला सांगेन की केनियातल्या ऑप्रेस्ड लोकांसाठी भारतातल्या पॉसिबली नॉन-ऑप्रेस्ड लोकांनी गिफ्ट पाठवलेली आहे असं समज. मग काय म्हणते बघूया.

हे अर्थात आत्ता मी लाइटली म्हणतेय, पण काही बाबतींत ती आमच्या फार मनाविरुद्ध वागलेली आहे. (कपाटातून एक केशरी रंगाची कार्डबोर्ड बॉक्स काढून त्यावरची अक्षरं वाचते.) शांथी टेलर्स. ('थ' चा उच्चार अतिशयोक्त करते.) ही मद्रासमधली कंपनी आहे. भरतनाट्यम करताना घालायची इमिटेशन जुवेलरी तयार करते. मिताली शिकत होती तेव्हा तिच्यासाठी घेतली होती. (यापुढे बॉक्समधले तीनचार आयटम बोलताबोलता घालून बघून बॉक्समध्ये परत ठेवून देते. पण हे ती चाळा म्हणून करते. दागिने तिच्या आवडीचे आहेत असं तिच्या आविर्भावांवरून वाटत नाही.) खरं म्हणजे मला भरतनाट्यम आवडत नाही. सतत तो धबकधबक-किणकिणकिणकिण आवाज मोनॉटोनस व्हायला लागतो. पण मितालीच्या दोन मैत्रिणींनी क्लास जॉईन केला होता तेव्हा तिनंच आपणहून विचारलं मी पण जाऊ का म्हणून. तिचा उत्साह किती टिकेल याचा भरवसा नव्हता. पण तेव्हा ती काहीशी ऑकवर्ड होती त्यामुळे या निमित्ताने पॉश्चर सुधारेल वगैरे मी आणि अभिषेकनं आपापसांत म्हणून घेतलं. मग आम्ही जोडीने क्लासला भेट दिली, आणि तिथलं वातावरण बघून फी वगैरे भरून मिस मिताली जोशीला एनरोल केलं. दर रविवारी सकाळी तो तिला क्लासला घेऊन जायचा, आणि मध्यंतरीच्या काळात ग्रोसरी शॉपिंग करून, क्लास संपला की परत घेऊन यायचा. अशी ती चांगली चारेक वर्षं शिकली, नाही असं नाही.

But you can depend upon her to be difficult. भरतनाट्यमच्या टिपिकल थीम्स ह्या अत्यंत पारंपारिक असतात. मितालीला त्या पेट्रिआर्कल वाटायच्या. अर्थात शबरीमोक्षम्, अहिल्याविमोचनम्

वगैरे प्रकारांत पुरुषाला सबॉर्डिनेट असणाऱ्या लीन आणि दीन स्त्रिया नायिका म्हणून आहेतच. There is no point in denying it. And this was a problem for Mitali. पण एक गोष्ट क्लॅरिफाय करायला हवी. असा सार्वत्रिक समज आहे की अमेरिकेत भरतनाट्यमचे क्लासेस घेणाऱ्या यच्चयावत सगळ्या परिमळा सीथारामन वगैरे नावांच्या, केसांत फुलं माळणाऱ्या आणि नाकात चमकी घालणाऱ्या टॅमब्रॅम बायका असतात. वास्तविक हा समज फक्त ऐंशी टक्के खरा आहे, पण म्हणून त्या सरसकट कॉन्झर्वेटिव्ह असतात असं काही नाही.

आमच्या लोकल परिमळामॅडमपण कित्येक वर्षं अमेरिकेतच राहताहेत, त्यामुळे मितालीच्या ह्या तक्रारीबद्दल त्यांना सहानुभूती होती. त्या तिला म्हणाल्या की शबरी ही आधुनिक अमेरिकन स्त्री नव्हे. तिचा जो भाव आहे, त्याच्याशी सदासर्वकाल एकरूप होणं तुला शक्य नाही आणि टीचर म्हणून माझी तशी अपेक्षाही नाही. फक्त नाचाच्या वेळी तुला तो अंगी बाणवायचा आहे. एक प्रकारे तो तात्पुरता परकायाप्रवेश आहे. आता हे म्हणायला ठीक आहे, पण सतत त्याच त्या थीम्स समोर येत राहिल्या की हा बचाव पटेनासा व्हायला लागतो. आणि याला अँटिडोट म्हणून डोळे मोठ्ठे करून आपण आदिशक्तीबिक्ती आहोत असं म्हणत पाय आपटून थयथयाट करण्यातही पॉइंट नाही. Two silly caricatures don’t cancel each other out. तर सारांश असा की मितालीची नाराजी काही पुरती गेली नाही.

यात भर म्हणजे एके दिवशी मितालीने यू-ट्यूबवर ‘हिस्ट्री ऑफ भरतनाट्यम’ वरचा कुठलातरी टेड की टेडेक्स टॉक बघितला. मला पण फॉरवर्ड केला. पूर्वी भरतनाट्यम देवळात करायचे आणि सध्या स्टेजवर करतात असा माझा गैरसमज होता, तो यामुळे दूर झाला. In reality, you are dancing through a minefield. We need another history lesson here, but this one is going to be murkier.

तामिळनाडूत कुठेतरी एक विशिष्ट जात आहे म्हणे. तिचं नाव जरा आडनिडं आहे, ते विसरले. तर मुळात ह्या जातीतल्या देवदासी बायका तो नाच करायच्या. त्याला सादिरअट्टम म्हणत असत - सादर करण्याशी याचा काहीतरी संबंध आहे. या बायकांना पिढ्यानपिढ्या राजाश्रय होता. आता हा

राजाश्रय तितकासा निरागस नसणार. म्हणजे राजा किंवा संस्थानिक जो कुणी असेल तो मिशीला तूप लावून नाच बघत असे, आणि नाच संपल्यावर सगळेजण आपापल्या घरी जात असत अशी शक्यता कमी आहे. ही देवदासी नंतर बहुतेक महालातच थांबत असणार. हा नाच श्रृंगारिक असायचा किंवा मग त्यापुढे जाऊन अश्लील असायचा अशा वदंता आहेत. ब्रिटिश आल्यानंतर मिशनरी लोकांच्या सोज्ज्वळ दृष्टीला हा नाच वाईट दिसायला लागला. मग त्याच्यावर हळूहळू बंदी आली किंवा निदान काही प्रमाणात तो अप्रतिष्ठित झाला, अशासारखं काहीतरी झालं. एकूण ती कला खाली जायला लागली. त्यानंतर काही वर्षांनी रुक्मिणीदेवी अरुंडेल नावाच्या बाईने हा नाच रिव्हाईव्ह केला. तिचे वडिल मूळचे शास्त्री, म्हणजे सॉलिड तामिळ ब्राह्मण होते. ढोबळ मानाने बोलायचं तर तिने नाचातला सगळा श्रृंगाररस ब्लीच करून टाकून त्याऐवजी सढळ हाताने भक्तिरस सब्स्टिट्यूट केला. त्याचं नाव बदलून भरतनाट्यम केलं, आणि भरताच्या नाट्यशास्त्रातून तो आला अशी कथा तयार केली. अशा प्रकारे हा नाच जो ब्राह्मणांच्या ताब्यात गेला तो अजूनही पुरता निसटलेला नाही.

It is pretty easy to imagine why Mitali would be upset with this. तिला हे अर्थात कल्चरल अप्रोप्रिएशन वाटलं. तिने हा विषय परिमळामॅडमशी काढलाच. आता मितालीला त्या ब्राह्मण समजल्या का हे नीट माहीत नाही. अमेरिकेत अशा गोष्टी उघडपणे बोलत नाहीत. पण कदाचित सब्लिमिनली समजल्या असतील, कारण तामिळ लोकांनाही मराठी आडनावांचा अंदाज असतो. Then again, 'Joshi' is an easy guess. आता मिताली स्वत: wolf in a sheep's clothing आहे हे तिलाही आम्ही समोर बसवून स्पष्ट सांगितलेलं नाही. एकूण जातिव्यवस्था हा विषय पोरांना समजावून द्यायला अवघड आणि ऑकवर्ड दोन्ही असतो, त्यामुळे इथले पुष्कळ मराठी पेरेंट्स यावर बोलायला उत्सुक नसतातच. मितालीने स्वत: वाचून किंवा सोशल मीडियावरून जी काही समजूत करून घेतली असेल ती असेल. तिने आम्हालाही मोकळेपणाने कधी काही विचारलेलं नाही.

तर परिमळामॅडमचं तिला म्हणणं असं की आपण मागे जाऊन इतिहास बदलू शकत नाही. झालं ते झालं. पण आत्ता ह्या पॉइंटला भरतनाट्यम जास्त इन्क्लूसिव्ह करण्यासाठी नक्कीच आपल्याला

प्रयत्न करता येतील. आणि तेही तुला पटत नसेल तर भरतनाट्यमवर नुसती बाहेरून टीका करणं हा उपाय नव्हे. You can change it from inside. त्या तिला कळकळीने म्हणाल्या की आधी तू क्लासिकल टेक्नीक पूर्ण शिकून घे. मग त्याच्यात तुला बंडखोरी करता येईल. एकदा तू एस्टॅब्लिश्ड डान्सर झालीस की त्यानंतर तुला फुटून निघून समजा दलितनाट्यम नावाचा वेगळा प्रकार सुरू करायचा असेल तर तशी मुभा आहे. आम्ही बघायला येऊ. पिकासोने असंच केलं होतं म्हणे. आधी कित्येक वर्षं चित्रकला घोटून तो माणसांचे चेहरे आहेत तसे काढायला शिकला, आणि एकदा त्याला कॉन्फिडन्स आल्यानंतर मग मोडकेतोडके काढायला लागला. This is the natural progression in any art. पण हे सगळं करायला खूप चिकाटी लागते. Mitali was good at dance, but not *that* good. तेव्हा मग मनातल्या मनात काहीतरी कॉस्ट-बेनिफिट अनॅलिसिस करून तिनं हळूहळू त्यातून अंग काढून घेतलं. All in all, she did not continue. We pleaded with her a lot, but that didn't help. निदान अरंगेत्रमपर्यंत तरी जायला हवं होतं. इतकी वर्षं इतके परिश्रम घेतले त्यातून मागे काही उरलं नाही असं आम्हाला वाटलं. साडेअकरा हजार रुपये खर्च करून थेट मद्रासमधून आणलेला हा सेट तेवढा पडून आहे.

(काही वेळ हाताने दागिने चिवडत राहते.) ही अर्थात सगळी साउदी पॅटर्नची बटबटीत जुवेलरी आहे. भरतनाट्यम म्हणजे आणखी काय अपेक्षा करणार ना? तरी पण एक वेगळा स्पेशल आयटम मी यात सांभाळून ठेवलेला आहे. That is just me being eccentric. (बॉक्समधून एक टिअरड्रॉप नेकलेस काढून गळ्यात घालते. छातीवर तो इकडेतिकडे सरकवून बघते.) ह्या नेकलेसचा इतिहास इंटरेस्टिंग आहे. गेली (विचार करून) चौदा वर्षं पाच महिने तो माझ्याकडे आहे. तो नेमका काय आहे हे न सांगता मी अधूनमधून मितालीलाही घालायला दिलेला आहे. She likes wearing it. Should I tell her what it is? पण ती कशी रिॲक्ट होईल ते सांगता येत नाही. Maybe she would think it is too weird.

हा माझा ब्रेस्टमिल्क नेकलेस आहे. मितालीचं वीनिंग चालू केलं तेव्हा कीपसेक म्हणून मी हा करून घेतला. ही एक ऑनलाईन कंपनी आहे. छोट्या बाटलीतून त्यांना आपल्या ब्रेस्टमिल्कचं सँपल

पाठवायचं, मग ते त्यावर कसलीतरी सीक्रेट प्रोप्रायटरी प्रॉसेस करून टिअरड्रॉपमध्ये इनसर्ट करून आपल्याला नेकलेस पाठवतात. हा घातल्यावर लगेच मला चोली के पीछे उचंबळून येतं असं काही नाही, पण आठवणी आहेत. I think I will donate the rest of the jewelry, but of course I will keep the necklace. (केशरी बॉक्स बिनमधल्या वारली बॅगेत ठेवते.) तात्पुरतं सगळंच बिनये स्वाहा करून टाकते, कुठलं कुठे द्यायचं ते नंतर बघू म्हणे. पण अर्थात भरतनाट्यमचे दागिने नैरोबीला पाठवण्यात पॉइंट नाही. इथे फेसबुक मार्केटवर कुणी सापडलं तर बघेन, नाहीतर सरळ एखाद्या चांगल्या मुलीला फुकट देऊन टाकेन.

(नेकलेस घालून आतल्या खोलीत जाता जाता उभ्या आरशात बघते.) You know me by now. हा मनाचा आरसा नसून गराज सेलमध्ये घेतलेला फेक-अँटीक आरसा आहे. याचाही मला कंटाळा आला आहे, पण घरात दुसरा येईपर्यंत हा देऊन टाकता येणार नाही. (स्वत:कडे निरखून बघत) नेकलेस छानच आहे. I should wear it more often. But by contrast, I think the football jersey is a great equalizer. कुठलीही बाई यात कुरूपच दिसते. (नेकलेस काळजीपूर्वक बाजूला काढून ठेवून जर्सी अंगातून उतरवते.) अभिषेकच्या ऑफिसकडून आम्हाला एकदा फुटबॉल गेमची तिकिटं मिळाली होती. त्यावेळी आपण इतर अमेरिकन लोकांत ब्लेंड-इन झालं पाहिजे अशी काहीतरी कल्पना डोक्यात घेऊन प्रत्येकी एकशेबहात्तर डॉलर्स देऊन त्याने असल्या दोन जर्स्या खरेदी केल्या. सिआटल सी-हॉक्स नक्की कोण हे तेव्हा मला अंधुकच माहीत होतं आणि अजूनही अंधुकच माहीत आहे. पण मी जर्सी घालून नवऱ्यामागोमाग निमूट गेले. मितालीने टॉक्झिक मॅस्क्युलिनिटी की असाच काहीसा आक्षेप घेऊन यायला नाही म्हटलं. In retrospect, that was a sensible move on her part. बेंगरूळ कपडे घातलेले दहापंधरा आडदांड बाप्ये डोकं गमावलेल्या मुरारबाजीसारखे इकडून तिकडे पळत होते. बराच वेळ त्यांच्याकडे डोळे फाडून बघूनसुद्धा मला खेळ काहीही कळला नाही. अतिशय बोअर झालं. पोटाला आधार शोधावा तर घाणेरड्या चवीची बिअर आणि पॉपकॉर्न काहीच्या काही किंमतीला विकत होते. एकूण ब्लेंड-इन होणं मला काही जमलं नाही. इतके पैसे खर्च केल्याचा गिल्ट येऊन नंतर ही जर्सी घरच्या घरी मी तीनचारदा घातली, पण मला वाटतं इतकं पापक्षालन पुरे झालं. (जर्सी बिनमध्ये टाकते.) ही युनिसेक्स आहे की नुसतीच

अनसेक्सी आहे हे पण मला माहीत नाही. मिस्टर ऑर मिसेस एनगुंडूही यात कुरूपच दिसणार, पण तो आता त्यांचा प्रॉब्लेम आहे.

(कपाट उघडून एक टी-शर्ट काढून अंगात घालते. गुस्ताव क्लिम्टचं 'The kiss' त्यावर छापलेलं आहे. नेकलेस पुन्हा गळयात घालते आणि चुंबन घेणाऱ्या दोन चेहऱ्यांवर टिअरड्रॉप येईल अशा तऱ्हेने ॲडजस्ट करते.) This was my favorite T-shirt to wear at home. रंग अमृतसरच्या सुवर्णमंदिरासारखा ढणढणीत आहे, पण मला आवडतो. Mitali used to get embarrassed whenever she saw me in it. Like lots of woke people, she is a little prudish. खरं म्हणजे fake it till you make it तत्वावर आणलेला हा टी-शर्ट आहे. अभिषेकला आणि स्वत:लाही नॉट-सो-सटल हिंटा देण्यासाठी. But I am not sure it really worked.

चारेक वर्षांपूर्वी माझी पाळी जायला लागली. पंचेचाळीसाव्या वर्षी म्हणजे तशी लवकरच. त्याच्या आधीपासून आमची फ्रीक्वेन्सी कमी व्हायला लागलीच होती, माझ्या अनियमित ब्लीडिंगमुळे ती आणखी कमी झाली. त्यातून मग ड्रायनेस, त्यामुळे नको वाटणं, मग नको वाटल्याबद्दल गिल्ट वाटणं हे सगळं येतंच. एकाला अनिच्छा असणार असं दुसरा ॲंटिसिपेट करतो, आणि मग पहिल्याची अनिच्छा केव्हातरी इच्छेत जरी पालटली तरी दुसरा तोपर्यंत दूर निघून गेलेला असतो. अशा बाबतींत 'communication is key' हे सुभाषित म्हणून ठीक आहे, but sometimes you subliminally don't want the key, because there are some doors you would rather not open. आणि वास्तविक पाहिलं तर शरीरं जुळण्यापूर्वी मनं जुळली पाहिजेत वगैरे माझा काही हट्टाग्रह नव्हता. पंधरावीस वर्षांपूर्वी केव्हातरी मन जुळलेलं असेल तर तेवढ्या भांडवलावर आत्ता नुसतं शरीर जुळायला माझी हरकत नव्हती. पण म्हणावं तसं ते नाही झालं. अभिषेकने प्रायोगिक तत्वावर लुब्रिकंट वगैरे आणून बघितले. एकात तर खोबरेल तेल होतं, त्यामुळे घर अमेरिकेत असूनही बेडरूम केरळमध्ये असल्यासारखं वाटायचं. तो आम्ही टाकूनच दिला.

(बाथरूममध्ये जाऊन एक बाटली आणते.) हा दुसरा एक वॉटर-बेस्ड लुब्रिकंट आहे. बाथरूमच्या खालच्या ड्रॉवरमध्ये केव्हाचा पडून आहे. (बाटली उंचावून नाव वाचते.) 'व्हा-ट' किंवा असंच

काहीतरी स्कॅन्डेनेव्हियन नाव आहे. (बोटाने हवेत टिंब दाखवत) हा उमलाउट की काय तो नुसता बघूनच माणसं आतून लुब्रिकेट व्हावीत असं त्यांचं मार्केटिंग गिमिक असणार. पण प्रत्यक्षात तसं झालं नाही. थोडा वेळ काम करायचा, with the obvious pun intended, पण वाळून गेला की पुन्हा लावावा लागायचा. माझी फार तक्रार नव्हती, पण नवऱ्याला एकूण काही तो प्रकार आवडला नाही. After a while, I think we lost interest in the whole thing and just let it go. (बाटली बिनमधल्या वारली बॅगेत टाकते, आणि बिनपासून हेतुपुरस्सर काहीशी दूर जाते.)

खरं म्हणजे हा कांद्याचा वरचा पापुद्रा नव्हे. That much is obvious. (थोडं थांबून) I should stay closer to the surface. (काही क्षण निरुद्देश हिंडत राहते. न बोलता किचनमध्ये जाऊन दोनतीन कॉफी मग आणि एक चहाचं भांडं शोधून आणून बिनमध्ये टाकते. जाता जाता काही जुनाट वह्या आणि एकदोन पुस्तकं तिच्या हाती लागतात.) Well, these can surely be dumped. ही मितालीची मराठीची वह्यापुस्तकं आहेत. Nobody is going to miss them, least of all Mitali.

माझं बरंचसं लहानपण या ना त्या कॅन्टोनमेंटमध्ये गेलं. तिथे सरसकट कामचलाऊ पातळीवरचं अर्धवट हिंदी-इंग्लिश चालायचं. नंतर कॉलेजला सिंबायोसिस. आणि अभिषेक रुरकीबिरकीत राहिलेला. त्यामुळे आम्ही दोघेही मायमराठीचे कढ काढणाऱ्यांपैकी नव्हेत. पण पिअर प्रेशर होतं. पुलो-अमेरिकन लोकांमध्ये पोटच्या गोळयाचा छळ करण्याचे जे सनदशीर मार्ग आहेत त्यात त्याला मराठी शिकवणं हा एक आहे. आमच्या ओळखीच्या कुटुंबांनी तो रीतसर प्रयत्न करून बघितला म्हणून आम्ही पण करून बघितला. The end result was not a surprise. हा सगळाच प्रकार डिप्रेसिंग आहे. अमेरिकेत वीकेंडला मराठी शिकवणाऱ्या शेकडो हौशी शाळा आहेत. हजारो पोरं त्यांतून प्रॉसेस होतात. पण तिथे जे काही जुजबी मराठी शिकतात ते नंतर अत्तरासारखं उडून जातं. अमेरिकेत वाढलेल्या पोराला सलग दहा मिनिटं मराठी बोलता येतं असं एकही उदाहरण आत्तापर्यंत मी बघितलेलं नाही. इथल्या विशाखा रानडेच्या घरी गंमतीदार प्रसंग पाहायला मिळतो. ती पोराशी आवर्जून मराठीत बोलते. तो आवर्जून इंग्लिशमध्ये उत्तर देतो. थोडा वेळ असं हे फोरहँड-बॅकहँड-

फोरहँड-बॅकहँड चालू राहतं. ऐकायला फार त्रासदायक वाटतं. मग तो हेडफोन लावून आपल्या खोलीत वैतागून निघून गेला की पॉइंट आपोआप त्याचा होतो. घरोघरी हेच चित्र असतं, पण लोक आपले ट्राय करत राहतात. शाळा तशाच चालू राहतात. The whole thing is a triumph of hope over experience. (वह्यापुस्तकं बिनमध्ये फेकते.)

खरं तर मी सुद्धा जास्त सीरियस मराठी इथे आल्यावर वाचायला लागले. याला कारण म्हणजे अमेरिकेचा असा एक कल्चर शॉक असतो याची मला आधी नीट कल्पना नव्हती. हा शॉक मात्र मला एकदम बसला नाही. इथे आमची बरीच वर्षं गेली आणि त्यांदरम्यान आम्ही अनेकदा गावं बदलली. हे सगळं होत असताना स्लो-मोशनमध्ये बसला. मॅडिसन, ह्यूस्टन, सिआटल, युजीन, कुठेही जा. मॅक्डॉनल्ड्स सगळीकडे तेच असणार हे एकवेळ ठीक आहे, पण मराठी मंडळही तेच असतं. पेटीवर 'ने मजसी ने' वाजवणारे रिटायर्ड इंजीनिअर गृहस्थ सगळीकडे असतात, लावणीनृत्य तेच असतं, वीकेंडला लाँग ड्राईव्हवर निघाले की सगळेजण 'म्हैस'ची सीडी ऐकतात. हे सगळं बघून मी म्हटलं की हे सखाराम गटणे आणि नारायण आणि कोचरेकरमास्तर वगैरे लोक कोण ते आपणही माहीत करून घेऊ. So I started reading. It was mildly enjoyable, but not much more than that. अर्थात तरुण वयात वाचलं असतं तर कदाचित जसं मेंदूत रुतून बसलं असतं तसं ते नंतर बसणार नाहीच. आता यावर टीका करताना लोक म्हणतात की हा सगळा नॉस्टॅल्जिया आहे. पण असेल तर वेगळ्या प्रकारचा आहे. उदाहरणार्थ, पुलंनी लिहिलं आहे की दुसऱ्या महायुद्धामुळे चाळीचं कंबरडंच मोडलं म्हणून. तेव्हा ते स्वत: विशीत होते. याचा अर्थ कोचरेकरमास्तर आणि सोकाजीराव त्रिलोकेकरांचं जे कुठलं गोल्डन एज असेल, ते खुद्द पुलंनीही कसंबसंच पाहिलेलं असणार. So it was already an indirect nostalgia for him, and it is an even more indirect nostalgia for us. पण ठीक आहे. कल्चर ही गोष्ट अशीच असते. आपल्याला ज्या गोष्टी आवडतात त्यांचा आपल्या वैयक्तिक अनुभवांशी बेताचाच संबंध असतो.

पण वाचनबिचन किंवा यू-ट्यूबवर कथाकथन ऐकणं वगैरे एकदा सुरू केलं की त्याचा स्वत:चा फ्लो असतो. Gradually I got drawn into the whole thing. तेव्हा मग काही वर्षांपूर्वी इथल्या

ओळखीच्या बायकांबरोबर मी बृहन्महाराष्ट्र मंडळाच्या अधिवेशनाला जाऊन आले. दोनदा. एकदा सिआटलला आणि एकदा फिलाडेल्फियाला. दोन्ही सारखीच होती. अमेरिकेच्या कानाकोपऱ्यांतल्या एकसारख्या एक मराठी मंडळांतले एकसारखे एक लोक आलेले होते. मला शालू चांगला दिसत नाही, पण उत्साहात मी पण खोट्या तुळशीवृंदावनासमोर फोटोबिटो काढून घेतले. त्यावेळच्या स्मरणिका इथेच कुठेतरी पडलेल्या असणार. (ढिगातून शोधून काढते.) इतक्या आवळ्याजावळ्या आहेत की कुठल्या वेळची कुठली हे कव्हर बघितल्याखेरीज कळत नाही. (बोलताबोलता सहज दोन्ही चाळून बघते.) आयकॉनोग्राफी सगळीकडे तीच आहे: मोठ्ठी नथ घालून ठसठशीत कुंकू लावून लेझीम खेळणाऱ्या बायका आणि मावळी टोपी घालून तुतारी फुंकणारे मिशाळ बाप्ये. 'क्षितिजावरती उंच भरारी', 'परंपरेची नवी उभारी' असे तेच ते शब्द आलटून पालटून दरवेळेला स्लोगन जुळवतात. आमचा तीनचार जणींचा ग्रूप होता म्हणून वेळ त्यातल्या त्यात बरा गेला, पण नाहीतर ते सगळं फार प्रेडिक्टेबल होतं. मी आता पुन्हा कधी जाईन असं वाटत नाही, पण उगीचच्या उगीच तणतणत 'तिथे डायव्हर्सिटी नाही' अशी मितालीछाप तक्रार करण्याचाही माझा स्वभाव नव्हे. तिथे कुणी निळे शेमले बांधून भीमाच्या आरत्या म्हणाव्यात अशी माझी अपेक्षा नव्हती, आणि मुळात त्या मला आवडतही नाहीत. तेव्हा आहे ते आहे. लोकांचा कंफर्ट झोन असतो तसे ते राहतात. त्यांच्या अभिरुचीकडे पेट्रनायझिंगली बघावं इतकी काही माझी स्वत:ची उच्च वगैरे नाही.

(अलार्म वाजतो. सेलफोनकडे बघून तो बंद करते.) It is time for my dinner date. (दोन्ही स्मरणिका निष्काळजीपणे बिनमध्ये फेकून देते.) आज एकूण डीक्लटरिंग माफकच होणार हे मला कळून चुकलंच होतं, पण हरकत नाही. नंतर बघू म्हणे. (इथे ती कपडे करायला सुरुवात करते. आधी चेहरा धुवून कोरडा करते. यानंतर टी-शर्ट, टिअरड्रॉप नेकलेस, स्वेटपँट आणि रनिंग शूज काढून टाकून एक फॉर्मल इव्हिनिंग ड्रेस घालते, केस विंचरते, लिपस्टिक लावते आणि कानात इअररिंग्स घालते. गळ्यात चोकर घालते. शेवटी हाय हील्सचे पाचसहा जोड बाहेर काढून त्यातला एक निवडून घालते. ह्या सगळ्या कृती आतबाहेर करत बोलताबोलता होतात.) अमृता देशपांडे आणि प्रीती साने, किंवा अमृता साने आणि प्रीती देशपांडे, किंवा जे काही असेल ते, ही अर्थात माझी लोणकढी थाप होती. ह्या काल्पनिक बायका आहेत. माझ्या खऱ्या डेटचं नाव अमरप्रीत सिंग. तर हा माणूस माझ्यापेक्षा नऊ वर्षांनी लहान आहे. आणि श्रीमंत आहे. हे मला माहीत होण्याचं कारण म्हणजे गेली

दोन वर्षं त्याचे टॅक्स रिटर्न मी करते आहे. इथे युजीनमध्ये एका ट्रकिंग कंपनीत आणि एका टॅक्सी कंपनीत त्याची भागीदारी आहे. फार शिकलेला नाही हे पटकन कळतं, पण प्रॅक्टिकल सेन्स असलेला माणूस आहे. आता सगळी इन्कम दाखवत नसल्यामुळे त्याचा रिटर्न काहीसा गोलमाल असतो, पण मीही मिसेस हरिश्चंद्रपणा न करता सद्विवेकबुद्धीत बसेल इतपत मदत त्याला करते. Well then, he has asked me out and I have said yes. He knows that I am married and I know that he is married. तेव्हा निदान सुरुवात तरी उभयपक्षी प्रांजळपणा सांभाळून झालेली आहे.

आमची डेट ठरली तेव्हा मी त्याला निक्षून सांगितलं होतं की इंडियन रेस्टॉरंट नको. So we have settled on an obscure Ethiopian place. साठे-लेले-गोखले तिथे कडमडण्याचा विशेष धोका नाही. आणि मी कारपण नेणार नाहीय, तो टॅक्सी पाठवेल. ती फुकट असणार हे सांगायला नकोच. माझा हा अब्राह्मणी रंग आणि चाफेनकळी नाक विचारात घेता माझ्यात काहीतरी सुप्त गुण असणार हे गौरी देशपांडे प्रिन्सिपलच्या आधारे आपोआप शाबीत होतं. ते काय आहेत हे शोधून काढण्याची जबाबदारी आता त्याची आहे. (इथपर्यंत ती कपडे करून तयार झालेली आहे.)

(सेलफोनकडे बघते.) Just got a text. टॅक्सी मिनिटाभरात येतेच आहे. (दीर्घ श्वास घेते. तिच्या हालचालींत किंचित चलबिचल दिसते.) सारस्वतांनो, मी कितपत मोठा गुन्हा करणार आहे हे मला माहीत नाही, पण तसा प्रसंग आलाच तर तो विनासायास करता यावा हे उत्तम. (बिनमधली लुब्रिकंटची बाटली अलगद उचलून पर्समध्ये टाकते आणि घराबाहेर पडते.)

